S - 20040719 1408 29001

**एकात्मिक बाल विकास सेवा योजना - नागरी प्रकल्पांतर्गत अंगणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस यांच्या नेमणूकांकरिता निवड समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र.एबावि.२००२/प्रक्र.४१७/का.६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ जानेवारी, २००४.

वाचा :- १. शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग क्र. सीडीएस १०८५/ ३१७१/सीआर २२५३/ एनसीडी, दिनांक १६ मे, १९८६.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि २००२/प्र क्र ४१७/का ६, दिनांक ३.१.२००३.
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ २००२/ प्र क्र ९५/ का७, दिनांक ५.४.२००३.

**शासन निर्णयः-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत नागरी प्रकल्पांमधील अंगणवाडी सेविका व मदतनीस यांची निवड करण्यासाठी उपरोक्त दिनांक ३ जानेवारी २००३ च्या शासन निर्णयान्वये विभागीय महिला व बाल विकास अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. तथापि, विभागातील पदांची पुनर्रचना करताना संदर्भाधिन अनु क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये विभागीय महिला व बाल विकास अधिकारी हे पद संपुष्टात आल्यामुळे उपरोक्त निवड समितीत अंशतः बदल करण्यात येत असून समितीची पुनर्रचना पुढील प्रमाणे करण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| १. | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | - | अध्यक्ष |
| २. | महानगर पालिका / नगरपालिका प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३. | प्रकल्पातील वैदयकीय अधिकारी | - | सदस्य |
| ४. | संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी | - | सदस्य सचिव |

उपरोक्त चार सदस्यीय समितीमधील समितीचे अध्यक्ष व सदस्य सचिव यांची उपस्थिती अनिवार्य असून उर्वरित दोन सदस्यांपैकी किमान एक सदस्य अशाप्रकारे एकूण तीन सदस्याची उपस्थिती आवश्यक राहील.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( जी. एम. फोपळणकर )**
उप सचिव

प्रत,

आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन,नवी मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय आयुक्त, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
ग्राम विकास व जल संधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
निवड नस्ती (कार्यासन- ६)